**मूल्यवर्धित कर प्रणाली संबंधीचे अंतिम निर्णय घेण्यासाठीची सचिव समिती.**

**महाराष्ट्र शासन.**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-विकअ-११.०२/प्रक्र.१४८/कराधान-१,**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांक: ९ ऑगस्ट २००२**

**शासन निर्णय**

दिनांक १ एप्रिल २००३ पासून मूल्यवर्धित विक्रीकर प्रणाली स्विकारण्यात येणार आहेत. तत्संबंधी महत्वाचे निर्णय घेण्याकरिता सचिव स्तरावरील समिती गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. या निर्णयास अनुसरुन खाली नमूद केल्याप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| (१) मुख्य सचिव | अध्यक्ष |
| (२) प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| (३) प्रधान सचिव (ऊर्जा) | सदस्य |
| (४) सचिव (उद्योग) | सदस्य |
| (५) सचिव (माहिती व तंत्रज्ञान) | सदस्य |
| (६) सचिव (वित्तीय सुधारणा) | सदस्य सचिव |

३. समितीचा कार्यकाल नियुक्तीच्या दिनांकापासून ३० जून २००३ पर्यन्त राहील.

४. **समितीची कार्यकक्षा**

मूल्यवर्धित विक्रीकर कायद्याच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने आवश्यक त्या शिफारसी शासनास करणे.

५. समितीचा दर्जा हा राज्यस्तरीय समितीचा असेल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ.गो.देशमुख )
शासनाचे उप सचिव

प्रत माहितीसाठी अग्रेषित.

१) समितीचे सर्व सदस्य.

२) सचिव,विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.

३) सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२.

४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

६) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.

७) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.

८) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई.

९) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई.

१०) मा.वित्तमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.

११) मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई-४०००१०.

१३) निवड नस्ती, कराधान-१.